GR-200404081807725001-0100

शासकीय/निमशासकीय इत्यादी सेवेतील एकाकी पदांना ( Isolated Post) लागू करण्यात आलेले आरक्षण रद्द करण्यासंदर्भात.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्र.बीसीसी-1097/प्र.क्र.20/97/16-ब,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक 21 सप्टेंबर, 1998.

वाचा :- शा.नि., सा.प्र.वि.क्र.-बीसीसी-1097/प्र.क्र.63/97/16-ब, दिनांक 18 ऑक्टोबर, 1997.

**प्रस्तावना :** शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-बीसीसी-1097/प्र.क्र.63/97/16-ब, दिनांक 18 ऑक्टोबर, 1997 च्या शासन निर्णयातील परिच्छेद 2(8) अन्वये "एकाकी पदास बिंदू नामावलीनुसार, आळीपाळीने आरक्षण ठेवावे. सुरुवातीस अनुसूचित जाती व त्यानंतर खुला असे आळीपाळीने (एक आड एक) या तत्वावर याचे पालन व्हावे" असे आदेश देण्यात आले आहेत.

यासंदर्भात, पोस्ट ग्रॅज्युएट इन्स्टिटयूट ऑफ मेडीकल एज्युकेशन अॅन्ड रिसर्च, चंदिगड विरुध्द फॅकल्टी असोसिएशन (रिव्हू पेटीशन (सिव्हील) क्रमांक-1749/97 चे सिव्हील अपील क्रमांक 3175/97) या आणि इतर प्रकरणी सर्वोच्च न्यायालयाच्या सांविधानिक पीठाने, दि.17.4.98 रोजी असा निर्णय दिला की, एकाकी पदास थेट किंवा आळीपाळीने आरक्षण लागू करता येणार नाही. सर्वोच्च न्यायालयाच्या या निर्णयानुसार उपरोक्त दि.18.10.97 च्या शासन निर्णयातील संबंधित आदेशामध्ये यथोचित सुधारणा करण्याचा प्रस्ताव, शासनाच्या विचाराधीन होता.

**निर्णय :-** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-बीसीसी-1097/प्र.क्र.63/97/16-ब, दिनांक 18.10.97 मधील परिच्छेद 2(8) अन्वये एकाकी पदास आळीपाळीच्या तत्वावर आरक्षण लागू करण्याचे जे आदेश देण्यात आले आहेत ते रद्द करण्यात येत आहेत. यापुढे शासकीय/निमशासकीय इत्यादी सेवेतील एकाकी पदांना आरक्षण लागू असणार नाही.

2. हे आदेश, शासकीय/निमशासकीय सेवा/मंडळे/महामंडळे/नगरपालिका/महानगरपालिका/जिल्हा परिषदा/शासकीय अनुदान प्राप्त संस्था/विद्यापीठे/सहकारी संस्था व शासकीय उपक्रम इत्यादींना बंधनकारक असल्याने त्यानाही लागू करण्यासंबंधी संबंधित मंत्रालयीन विभागांनी योग्य ते आदेश त्वरित निर्गमित करावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शि.शा.हिरीजगनेर,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे अ.मु.स./उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव व सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव,सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
सचिव, राज्य निवड मंडळ,
संचालक, समाज कल्याण, पुणे,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष), सर्व विभागीय आयुक्तांची कार्यालये,
महालेखापाल, महाराष्ट्र 1/2 (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र 1/2 (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

* पत्राने.

एच-901(च)(5,000-9-98)